रचना संसद कॉलेज ऑफ अप्लाईड आर्ट अँड क्राफ्ट, प्रभादेवी, मुंबई या महाविद्यालयात नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एडीआर-२७२१/( प्र.क्र.११६/१६ )/तांशि-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०४ नोव्हेंबर, २०१६

वाचा :- १) संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ, मुंबई विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. संलग्नता/आय सी डी/२०१६-१७/२२७,दि. ३०.०४.२०१६
२) कला संचालनालयाचे पत्र क्र. डिओअे-२०१६/दोन/१८७९, दि. १२.०८.२०१६ व क्र. डिओअे-२०१६/दोन/१८७९, दि. १२.०८.२०१६.

**शासन निर्णय** -

संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ, मुंबई विद्यापीठ, मुंबई यांनी त्यांचे दि. ३०.०४.२०१६ च्या पत्रान्वये रचना संसद कॉलेज ऑफ अप्लाईड आर्ट अँड क्राफ्ट, प्रभादेवी, मुंबई या महाविद्यालयात बी.एफ.ए.स्कल्पचर, बी.एफ.ए.ड्रॉईंग ॲन्ड पेंटिंग व बी.एफ.ए.सिरॅमिक हे तीन अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. सदर प्रस्तावासंदर्भात उक्त संस्थेत असणाऱ्या शैक्षणिक सोयी-सुविधा व सदर संस्था निकषांची पूर्तता करते किंवा कसे याची तपासणी करण्याकरिता कला संचालनालयाने गठीत केलेल्या त्रिसदस्यीय समीतीने वरील अभ्यासक्रम सुरु करण्यासंदर्भातील निकषांच्या पूर्ततेबाबतचा सादर केलेला अहवाल तसेच प्र.कला संचालक, यांनी केलेली शिफारस विचारात घेऊन, रचना संसद कॉलेज ऑफ अप्लाईड आर्ट अँड क्राफ्ट, प्रभादेवी, मुंबई या महाविद्यालयात शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून कायम विनाअनुदान तत्वावर पुढील अभ्यासक्रम सुरु करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विषय | मंजूर प्रवेश क्षमता |
|---|---|---|
| १ | बी.एफ.ए.स्कल्पचर | ०५ |
| २ | बी.एफ.ए.ड्रॉईंग ॲन्ड पेंटिंग | ३० |
| ३ | बी.एफ.ए.सिरॅमिक | ०५ |

**अटी व शर्ती**

१. संस्थेने कला संचालनालयाकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे विनाअट हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

२. कला संचालक, मुंबई यांनी हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

३. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयाने अध्यापक/कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री प्र. कला संचालक, मुंबई यांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३ (५) नुसार ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून देण्यात येत आहे.

६. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या ( ॲफिलिएशन ऑफ कॉलेजेस बाय युनिव्हर्सिटीज ) रेग्युलेशन २००९ मधील महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयास संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

७. शिक्षण शुल्क व इतर आकारावयाच्या शुल्काचे दर हे शासन / शिक्षण शुल्क समितीने विहित केलेल्या दराप्रमाणे असतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०४१६३१४१२८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2016.11.15 16:48:16 +05'30'

**( का.रा.पिळणकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
२. प्र.कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. निरिक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. उपाध्यक्ष, रचना संसद, २७८, शंकर घाणेकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.
५. निवडनस्ती.